"मागणी क्रमांक : डब्ल्यू-४ २२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, ( ०२ ) कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण, जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प, ( ०२ )( ०३ ) कारागिरांसाठी तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षणाचा विस्तार, (राज्य हिस्सा) २२३० १६५३ (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली अधिकची तरतुद पुरवणी मागणीन्वये मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :अर्थसं २४११/२०१४/४९/प्र. क्र.४४/व्यशि-२,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ४ ऑगस्ट, २०१४

<u>वाचावे</u> :- (१) सहसंचालक, व्यवसाय व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक:-डिव्हीईटी/२०१४/आ(२)(१)/प्र.क्र.४१/का-१४, दिनांक ०६.०५.२०१४.

(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : पूरक २०१४/प्र.क्र.११२/अर्थसंकल्प-३, दिनांक :-०४ जूलै, २०१४.

<u>प्रस्तावना</u> :-

संचालनालयाने संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) अन्वये, कामगार व कामगार कल्याण या उप विकासक्षेत्रांतर्गत, " जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्पांतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा दर्जा वाढ करणे" ( योजना क्रमांक -१११२०००९ ) या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी "मागणी क्रमांक : डब्ल्यू -४, २२३० कामगार व सेवायोजन, ०३ प्रशिक्षण, जागतिक बँक सहाय्यित

प्रकल्प, ( ०२ ) ( ०३ ) कारागिरांसाठी तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षणाचा विस्तार, (राज्य हिस्सा ) २२३० १६५३" या लेखाशीर्षाखाली जून २०१४ च्या अधिवेशनात रुपये ४६३.६० लक्ष इतका निधी पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्याअनुषंगाने, वित्त विभागाने संदर्भ क्रमांक ( २ ) च्या परिपत्रकान्वये सन २०१४-१५ या वर्षाचा महाराष्ट्र (पुरवणी ) विनियोजन अधिनियम, २०१४ ( सन २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-२१ ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग -४ दिनांक २५ जून,२०१४ यामध्ये प्रसिध्द करण्यात आला असल्याचे कळविले असून परिपत्रकात नमूद केल्यानुसार सर्व संबंधिकांना सूचना देण्याचे निर्देशित केले आहे.

**<u>शासननिर्णय:-</u>**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या प्रस्तावास, वित्त विभागाने सन२०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी, " मागणी क्रमांक डब्ल्यू-४, २२३० कामगार व सेवायोजना, ०३ प्रशिक्षण, ( ०२ ) कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण, जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प, ( ०२ ) (०३ ) कारागिरांसाठी तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षणाचा विस्तार, ( राज्य हिस्सा ) २२३० १६५३) (योजनांतर्गत )" या लेखाशीर्षाखाली, "आकस्मिकता निधीतून काढलेला निधी यापुढे आकस्मिकता निधीच्या खर्च खाती न टाकता, एकत्रित निधीच्या खाती खर्ची टाकणे" या अटीच्या अधीन राहून अर्थसंकल्पीत केलेला रुपये ४६३.६० लक्ष (रुपये चार कोटी त्रेसष्ठ लक्ष साठ हजार फक्त ) इतका निधी खर्च करण्यास मंजूरी दिली आहे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक-१२१ / अर्थ -८, दिनांक:- २७.०५.२०१४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०५११३१३५०८०८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramchandra Wanjari

Digitally signed by Vilas Ramchandra Wanjari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramchandra Wanjari
Date: 2014.08.05 11:33:17 +05'30'

(विलास रा. वंजारी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक ( व्यवसाय शिक्षण ), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, मुंबई,

२) संचालक (व्यवसाय प्रशिक्षण ), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र,मुंबई,

३) महालेखापाल-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर,

४) महालेखापाल १/२, ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

५) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई,

६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

७) साशि-१ कार्यासन, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) वित्त विभाग ( व्यय-५ ), मंत्रालय, मुंबई,

९) नियोजन विभाग (१४७१ ), मंत्रालय,मुंबई,

१०) निवड नस्ती, व्यशि- २.